अंगणवाडी केंद्रातील ६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील लाभार्थी, गरोदर व स्तनदा माता, तीव्र कमी वजनाची बालके तसेच ११ जिल्हयातील सबला योजनेंतर्गत किशोरवयीन मुलींना घरपोच आहार (THR) पुरवठा करण्यासाठीच्या ई- निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एबावि-२०१७/प्र.क्र. १०९ /का-५**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक:- २९ एप्रिल, २०१७

वाचा :- १) शासन पत्र क्र. एबावि-२०१४/प्र.क्र. ४६/का-५ दि. २६/२/२०१६

२) शासन पत्र क्र. एबावि-२०१४/प्र.क्र. ४६/का-५ दि. २९/२/२०१६

३) शासन पत्र क्र. एबावि-२०१४/प्र.क्र. ४६/का-५ दि. ४/३/२०१६

४) मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली, येथे सुरु असलेल्या SLP क्र. २९१७८/२०१६ मध्ये दि. १९/४/२०१७ रोजी दिलेले अंतरिम आदेश

५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. १२४५ दि. २५/४/२०१७

६) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. १२६१ दि. २६/४/२०१७

७) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. १२८५ दि. २८/४/२०१७

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालय, रिट पिटीशन क्र. १९६/२००१ मध्ये दिनांक ७/१०/२००४ व २२/४/२००९ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार केंद्र शासनाचे पत्र दि. २४/२/२००९ अन्वये सुधारित पोषण आहार पध्दती लागू करण्यात आली त्यानुसार महिला व बाल विकास विभागाचा शासन निर्णय क्र. एबावि-२००८/प्र.क्र.५९/का-५ दि. २४/८/२००९ अन्वये ६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील लाभार्थी, गरोदर व स्तनदा माता, तीव्र कमी वजनाची बालके यांना सुक्ष्म पोषक तत्वांनी Extrusion Technology द्वारे समृध्द (Fortified) केलेले स्वच्छतापूर्ण (Hygienic) वातावरणात तयार केलेला THR आहार देणेबाबत निर्देश प्राप्त झाले होते, त्यानुसार आयुक्तालय, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंमार्फत सन २००९-२०१० मध्ये निविदा प्रक्रिया राबविण्यात आली त्यामध्ये ३ महिला संस्थाची निवड करण्यात आली होती. सदर निविदा प्रक्रियेनुसार ३ महिला संस्थाचा THR

पुरवठयाचा कालावधी माहे जुन २०१३ पर्यंत होता. सदर निविदेची मुदत संपण्यापूर्वी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी त्यांचे कार्यालयाचे पत्र क्र. २४/५/२०१३ अन्वये स्थानिक स्तरावरुन जिल्हास्तरीय आहार समितीमार्फत जिल्हास्तरावरुन निविदा प्रक्रिया राबविण्यात आली. त्यानिविदा प्रक्रियेमध्ये आजतागायत ५५३ प्रकल्पांपैकी ३५२ प्रकल्पांमध्ये स्थानिक बचत गट/महिला मंडळांमार्फत THR पुरवठा करण्यात येत आहे.

दरम्यानच्या काळात केंद्र शासनाने दि. २४/१२/२०१३ व २६/९/२०१४ च्या पत्रान्वये मार्गदर्शक सुचना निर्गमित केलेल्या आहेत. तसेच National Food Security Act २०१३ पारित झालेले आहेत. सदर मार्गदर्शक सुचनांनुसार तसेच स्थानिक बचत गटांमार्फत सुरु न झालेले उर्वरित प्रकल्प व सन २०१३ च्या निविदा प्रक्रियेनुसार ज्या बचत गटांना ३ वर्षे पुर्ण होतील असे प्रकल्पांना निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी व त्याच्या अटी शर्ती निश्चित करण्यासाठी मा.अतिरिक्त मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीच्या अहवालानुसार व कॅबिनेटने मान्यता दिल्यानुसार शासन निर्णय क्र. एबावि-२०१४/प्र.क्र.४६/का-५ दि. २९ फेब्रुवारी,२०१६ अन्वये ई-निविदा प्रक्रिया राबविणेसाठी मान्यता देण्यात आली होती. त्याअनुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी राज्यातील ग्रामीण/आदिवासी व नागरी सेक्टर निहाय THR आहार पुरवठयासाठी दि. ८/३/२०१६ रोजी ६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील लाभार्थी, गरोदर व स्तनदा माता, तीव्र कमी वजनाची बालके तसेच सबला योजनेंतर्गत किशोरवयीन मुलींना सुक्ष्म पोषक तत्वांनी सुक्ष्म पोषक तत्वांनी Extrusion Technology द्वारे समृध्द (Fortified) केलेले स्वच्छतापूर्ण (Hygienic) वातावरणात तयार केलेला THR आहार पुरविण्यासाठी ई-निविदा प्रकाशित केली होती. सदर ई-निविदा ५२ दिवसांसाठी On-Line भरण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात आली होती. त्यामध्ये एकुण ८२ निविदाधारक महिला बचत गट/महिला मंडळ/महिला संस्थांनी ई-निविदेद्वारे On-Line टेंडर भरलेले होते. सदर ई-निविदा प्रक्रिया ३ टप्प्यात पुर्ण करण्यात आली.

मा. सर्वोच्च न्यायालयात राज्य शासनामार्फत SLP क्र. २९१७८/२०१६ दाखल करण्यात आली होती. सदर SLP मध्ये दि. १९/४/२०१७ रोजी मा. सर्वोच्च न्यायालयात झालेल्या सुनावणीच्या वेळी मा. न्यायालयाने ज्या महिला मंडळ/महिला बचत गट/महिला संस्थांच्या THR पुरवठयाच्या कामास ३ वर्षाची मुदत दि. ३०/४/२०१७ पूर्वी किंवा अखेरपर्यंत संपलेली आहे अशा महिला बचत गट/महिला मंडळ/महिला संस्थांचे काम तात्काळ दि. ३०/४/२०१७ पूर्वी रद्द करुन त्याठिकाणी नव्याने निवड झालेल्या १८ पात्र महिला बचत गट/महिला मंडळ/महिला संस्थांना दि. १ मे, २०१७ पासून Pro-rata Basis वर सदर SLP २९१७८/२०१६ च्या अधिन राहून पुरवठा

आदेश देण्याचे निर्देश आहेत. त्यानुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दि. १९/४/२०१७ रोजीच्या निर्णयाच्या अधीन राहून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे स्तरावर राबविण्यात आलेल्या THR आहार पुरवठयाच्या ई-निविदा प्रक्रियेत पात्र झालेल्या १८ महिला मंडळ/बचत गट/महिला संस्थाच्या उत्पादन केंद्रास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे राज्यातील ग्रामीण/आदिवासी व नागरी सेक्टर निहाय THR आहार पुरवठयासाठी आयुक्तालय, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी राज्य स्तरावर मागविण्यात आलेल्या दि. ८/३/२०१६ रोजीच्या ६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील लाभार्थी, गरोदर व स्तनदा माता, तीव्र कमी वजनाची बालके तसेच सबला योजनेंतर्गत किशोरवयीन मुलींना सुक्ष्म पोषक तत्वांनी सुक्ष्म पोषक तत्वांनी Extrusion Technology द्वारे समृध्द (Fortified) केलेले स्वच्छतापूर्ण (Hygienic) वातावरणात तयार केलेला THR आहार पुरविण्यासाठी मागविण्यात आलेल्या ई-निविदा प्रक्रियेस व सदर ई-निविदेअंती पात्र झालेल्या १८ महिला मंडळ/बचत गट/महिला संस्थाच्या उत्पादन केंद्रास दि. १ मे, २०१७ पासून Pro rata Basis वर मा. सर्वोच्च न्यायालयात सुरु असलेल्या SLP २९१७८/२०१६ च्या अधिन राहून पुरवठा आदेश देण्याबाबत खालील अटी शर्तीनुसार या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**१)** ज्या महिला मंडळ/महिला बचत गट/महिला संस्थांच्या THR पुरवठयाच्या कामास ३ वर्षाची मुदत दि. ३०/४/२०१७ पूर्वी किंवा अखेरपर्यंत संपलेली आहे अशा महिला बचत गट/महिला मंडळ/महिला संस्थांचे काम दि. ३०/४/२०१७ पूर्वी रद्द करण्यात यावे.

**२)** ज्या महिला बचत गट/महिला मंडळ/महिला संस्थांचे काम मुदत संपल्यामुळे रद्द केले जाणार आहे त्याठिकाणी नव्याने निवड झालेल्या १८ पात्र महिला बचत गट/महिला मंडळ/महिला संस्थांना दि. १ मे, २०१७ पासून मा. सर्वोच्च न्यायालयाचे SLP २९१७८/२०१६ मध्ये दि. १९/४/२०१४ च्या आदेशानुसार Pro rata Basis वर आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी पुरवठा आदेश देण्याची कार्यवाही करावी.

**३)** ज्या ठिकाणी जुन्या निविदा प्रक्रियेनुसार ३ वर्षे पुर्ण झाल्यानंतर THR आहार पुरवठयाचे काम रद्द केले आहे त्या ठिकाणी निविदा अटीशर्तीच्या अधीन राहून सोबत जोडलेल्या

**परिशिष्टा**प्रमाणे १८ बचत गट/महिला मंडळ/महिला संस्था यांना त्यांच्या नामासमोर नमुद केलेल्या ग्रामीण व नागरी सेक्टर नुसार THR आहार पुरवठयाचे काम वितरीत करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४) तसेच दि. १ मे, २०१७ नंतर ज्या महिला मंडळ/महिला बचत गट यांची THR पुरवठयाच्या कामाची मुदत प्रथम पुरवठा आदेश दिल्यापासून ज्या तारखेस ३ वर्षे पुर्ण होतील, त्या तारखेनंतर संबधित महिला मंडळ/महिला बचत गटाचे THR पुरवठयाचे काम रद्द करुन सदरचे काम या शासन निर्णयान्वये ज्या जिल्हयातील ज्या सेक्टरसाठी महिला मंडळ/महिला बचत गट/महिला संस्थांची निवड झालेली आहे. त्यांना मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक १९/४/२०१७ च्या अंतिरिम आदेशानुसार THR पुरवठयाचे काम देण्याची कार्यवाही आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी करावी.

५) ज्या महिला बचत गट/महिला मंडळ/महिला संस्थांना THR पुरवठयाच्या कामास ३ वर्षाची मुदत संपलेली नाही. त्यांचे काम ३ वर्षाची मुदत संपण्यापर्यत सुरु ठेवण्यात यावे.

६) पोषण आहाराचे प्रति दिन प्रति लाभार्थी दर हे राज्य शासनाच्या वित्त विभागाने मान्य केल्यानुसार लागू राहतील.

७) निविदेतील अटी शर्तीमधील Proposal Procedure अंतर्गत Proposal Data Sheet यामध्ये अ.क्र. 7 Contract Time- 5 years from the date of execution of the Contract and further extendable up to two years असे नमुद असल्यामुळे ५ वर्षासाठी करारनामा करण्यात यावा. तद्नंतर आवश्यकता वाटल्यास शासनाच्या मान्यतेने पुढील २ वर्षाचा वाढीव करार करण्यात येईल.

८) निविदा प्रक्रिये अंतर्गत निविदाधारकाने जे युनिट तपासणीवेळी दाखविलेले आहे व ते पात्र ठरलेले आहे, त्याच युनिटवरुन उत्पादन व पुरवठा करणे पुरवठादारावर बंधनकारक राहिल. इतर युनिटवरुन झालेला पुरवठा अवैध ठरविण्यात येईल आणि संबधित संस्थेचे पुरवठा आदेश रद्द करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०५०२१३१५४०३४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.05.02 16:05:20 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) मा. सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६) सर्व मंत्रालयीन विभाग
१७) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
१८) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) सचिव, बाल हक्क संरक्षण आयोग
२०) सदस्य सचिव, राज्य महिला आयोग
२१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२२) सर्व विभागीय आयुक्त

२३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
२४) सर्व जिल्हाधिकारी
२५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२६) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
२७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२९) वित्त विभाग/व्यय-६, मंत्रालय, मुंबई
३०) नियोजन विभाग/का.१४७२, मंत्रालय, मुंबई
३१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
३२) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
३३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी)
३४) सर्व एकात्मिक बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी)
३५) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
३६) संबधित पुरवठेदार महिला मंडळ/महिला बचत गट/महिला संस्था
३७) निवड नस्ती (कार्यासन ५).

## परिशिष्ट

शासन निर्णय क्र. एबावि-२०१७/प्र.क्र.**१०९** /का-५ दि. **२९/४/**२०१७ चे परिशिष्ट

| अ.क्र. | महिला मंडळ/महिला बचत गट/महिला संस्थेचे नांव | या शासन निर्णयान्वये वाटप केलेले ग्रामीण सेक्टर व नागरी सेक्टर |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | साळवेश्वरी वुमन ॲन्ड चाईल्ड डेव्हलोपमेन्ट वुमन्स सोसा. परभणी | **नागरी सेक्टर-** भंडारा, गडचिरोली |
| २ | अमृत स्वयंसहाय्यता महिला बचत गट, धुळे | **नागरी सेक्टर-** अकोला, वर्धा, वाशिम |
| ३ | स्त्री आधार महिला मंडळ, पुणे | **नागरी सेक्टर-** सोलापूर |
| ४ | मोरेश्वर महिला बचत गट, जालना | **नागरी सेक्टर-** अमरावती, रत्नागिरी, जालना |
| ५ | आशा महिला बचत गट, औरंगाबाद | **नागरी सेक्टर-** औरंगाबाद |
| ६ | सिध्दकला महिला बचत गट, सांगली | **ग्रामीण सेक्टर-** सिंधुदूर्ग<br>**नागरी सेक्टर-** कोल्हापूर |
| ७ | निलाक्षी बहुउद्देशीय महिला मंडळ, सांगली | **ग्रामीण सेक्टर-** रत्नागिरी<br>**नागरी सेक्टर-** सांगली |
| ८ | जागृती प्रगती महिला बचत गट, लातूर | **नागरी सेक्टर-** पुणे, अहमदनगर |
| ९ | जगदंबा महिला बचत गट, परतूर, जालना | **नागरी सेक्टर-** परभणी |
| १० | स्त्री आधार महिला बचत गट लातूर | **नागरी सेक्टर-** हिंगोली, लातूर, उस्मानाबाद |
| ११ | गौरी महिला बचत गट, बसमत | **नागरी सेक्टर-** ठाणे, सातारा |
| १२ | रेणूकामाता महिला बचत गट, कन्नड | **ग्रामीण सेक्टर-** वर्धा<br>**नागरी सेक्टर-** चंद्रपूर, गोंदिया |

| | | |
|---|---|---|
| १३ | मारिया महिला बचत गट, लातूर | **नागरी सेक्टर**- नाशिक |
| १४ | महालक्ष्मी महिला विकास संस्था, हिंगोली | **नागरी सेक्टर**- नांदेड, धुळे |
| १५ | भक्ती महिला बचत गट, हिंगोली | **ग्रामीण सेक्टर**- वाशिम |
| १६ | महालक्ष्मी महिला गृहउद्योग बालविकास बहुउद्देशीय इंडस्ट्रिज, को. ऑप. सोसा. लि. नांदेड | **युनिट-१, युनिट-२- , युनिट-३**<br>**ग्रामीण सेक्टर**- अहमदनगर, ठाणे, पालघर, पुणे, कोल्हापूर, सातारा, रायगड, सांगली, सोलापूर, उस्मानाबाद, अकोला, हिंगोली, नांदेड, परभणी.<br>**नागरी सेक्टर**- मुंबई शहर व मुंबई उपनगर |
| १७ | महाराष्ट्र महिला सहकारी गृहउद्योग लि. धुळे | **युनिट-१ व युनिट-२-**<br>**ग्रामीण सेक्टर**- औरंगाबाद, धुळे, नंदुरबार, नाशिक, जळगांव<br>**नागरी सेक्टर**- जळगांव |
| १८ | व्यंकटेश्वरा महिला औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था, मर्या. उदगीर, लातूर | **युनिट-१ , युनिट-२ , व युनिट-३**<br>**ग्रामीण सेक्टर**- भंडारा, बुलढाणा, गडचिरोली, जालना, नागपूर, यवतमाळ, गोदिया, अमरावती, बीड, चंद्रपुर, लातूर<br>**नागरी सेक्टर**- बीड, नागपूर, बुलढाणा, यवतमाळ |

..............................................